शासकीय/निमशासकीय/नगरपालिका/महानगरपालिका/ मंडळे/ महामंडळे /शासकीय उपक्रम / संविधानिक संस्था / अन्य संस्था इत्यादी यांनी एकूण मंजूर पदे, त्यानुसार भरावयाची आरक्षणाची पदे, भरलेली पदे व रिक्त पदे यांची माहिती वेबसाईटवर प्रसिध्द करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

पूरकपत्र क्रमांक : बीसीसी-२०१०/प्र.क्र.५८४/१०/१६-ब

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २३ ऑगस्ट, २०११.

**संदर्भ** : सामान्य प्रशासन विभागाचे क्रमांक : बीसीसी-२०१०/प्र.क्र.५८४/१०/१६-ब, दिनांक ३० जून, २०११ चे शासन परिपत्रक

**पूरकपत्र :**

वरील संदर्भाधीन शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र.५ मध्ये "खुद्द मंत्रालयातील जी पदे विविध मंत्रालयीन विभागाकडून भरण्याची कार्यवाही केली जाते, उदा. शिपाई संवर्ग अशा सर्व पदांबाबतची माहिती प्रत्येक मंत्रालयीन विभागाने संबंधित माहिती वेबसाईटवर प्रसिध्द करण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग कार्यासन-१४ यांच्याकडे विहित कालावधीत पाठविणे आवश्यक राहिल." असे आदेश देण्यात आले आहेत. याबाबत आता असे सुधारित आदेश देण्यात येत आहेत की, खुद्द मंत्रालयातील जी पदे विविध मंत्रालयीन विभागांकडून भरण्याची कार्यवाही केली जाते, त्याबाबतची माहिती विभागांनी आपल्या वेब साईटवर स्वतंत्रपणे प्रसिध्द करावी.

२. सदर पूरकपत्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सु. ना. रणखांबे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

राज्यपाल यांचे सचिव,

मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,